शासकीय योजनांची फिरत्या वाहनाव्दारे
प्रसिध्दी करण्यासाठी संस्थेसोबतच्या
दरकरारास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०११/प्र.क्र.३१८ /३४
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक:-३० ऑगस्ट २०११.

वाचा :- संचालक ( माहिती/प्रशासन) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे
पत्र क्रमांक- प्रकाशने/२०११-१२/का-३/३७६ दिनांक ११/८/२०११ चे पत्र.

**शासन निर्णय** :- शासनाच्या ध्येय धोरणाची, विविध जनकल्याणकारी योजनांची/ कार्यक्रमांची माहिती व प्रसिध्दी फिरत्या वाहनाव्दारे करण्यात येते. अशा प्रकारे फिरत्या वाहनाव्दारे प्रसिध्दी करण्याचे काम करण्यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत कंत्राटदारांकडून विहित पध्दतीने निविदा मागविण्यात आल्या होत्या. त्यापैकी महासंचालनालयातील खरेदी समितीने शिफारस केल्यानुसार मे.दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी , अमरावती यांच्यासोबत खालीलप्रमाणे तीन वर्षासाठी दरकरार करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**किमान ५ गावांसाठी प्रति वाहन प्रति दिन दर**

| अ.क्र. | कामाचे नाव | कालावधी | दर |
|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्रातील ग्रामीण/डोंगराळ/ अतिदुर्गम/ आदिवासी नक्षलग्रस्त / शहरी भागात शासकीय योजनांची फिरत्या वाहनाव्दारे प्रसिध्दी करणे | दि. १/८/२०११ ते दि.३१/७/२०१२ | रु. ८,९०४ + सेवा कर |
| | | दि. १/८/२०१२ ते दि. ३१/७/२०१३ | रु. ९,७९४ + सेवा कर |
| | | दि. १/८/२०१३ ते दि.३१/७/२०१४ | रु.१०,७७४ + सेवा कर |

मे.दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी , अमरावती या संस्थेशी दरकरार करताना खालील अटी व शर्तीचा समावेश करण्यात यावा.

१. मे.दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी , अमरावती यांनी त्यांच्या दिनांक २७ जुलै, २०११ च्या निविदेव्दारे महाराष्ट्रातील ग्रामीण /डोंगराळ / अतिदुर्गम/ आदिवासी /नक्षलग्रस्त / शहरी भागात शासकीय योजनांची फिरत्या वाहनाव्दारे प्रसिध्दी करण्याच्या कामांसाठी सादर केलेले दर हे दिनांक १/८/२०११ ते दि. ३१/७ /२०१२, दि. १/८/२०१२ ते दि.३१/७ /२०१२, दि. १/८/२०१३ ते दि. ३१/७/२०१४ या तीन वर्षाच्या कालावधीसाठी वर नमुद केल्याप्रमाणे अस्तित्वात राहतील.

२. मे.दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी , अमरावती यांचे प्रसिध्दीसाठी वापरावयाचे वाहन हे किमान पीक अप जीप वा २५५० किंवा त्यापेक्षा अधिक अश्वशक्तीचे असणे आवश्यक राहील. गाडीच्या दर्शनी व मागील बाजूस जाहिरातीचा फलक किमान '५ x ३' आणि बाजूचे फलक ' ८ x ३ ' या आकाराचे असावेत. लेटेस्ट व्हर्जनची ध्वनीक्षेपक यंत्रणा व जनरेटर वाहनाना बसविणे आवश्यक राहील.

३. मे.दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी , अमरावती यांनी प्रतिदिनी प्रति मोबाईल व्हॅनव्दारे ५ गावांमध्ये प्रसिध्दी करणे किंवा ५ अंगणवाडी क्षेत्रात प्रसिध्दी करणे बंधनकारक राहील. तसेच पाच गांवे किंवा पाच अंगणवाडया यामधील अंतर ८० कि.मी . पेक्षा जास्त नसावे.

४. मे.दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी , अमरावती यांनी महाराष्ट्रातील ग्रामीण अंगणवाडी स्थित गावांमध्ये मोबाईल व्हॅनव्दारे व्यापक प्रसिध्दी केल्यानंतर अंगणवाडी सेवा/ पटवारी/ सरपंच/ ग्रामसेवक यांचे प्रमाणपत्र घेऊन

बालविकास प्रकल्प/तहसीलदार/ जिल्हा प्रसिध्दी अधिकारी यांच्यापैकी एका अधिका-याचे प्रमाणपत्र घेणे बंधनकारक राहील.

५. मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी यांना फिरत्या गाडयांवर प्रसिध्दी करण्यात येणा-या योजनेचा प्रसिध्दीचा मजकूर संबधीत शासकीय/निमशासकीय/स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या कार्यालयामार्फत पुरविला जाईल.

६. संबंधित विभागाकडून कामाचा कार्यारंभ आदेश मिळाल्यानंतर सदर विभागाचे प्रसिध्दीचे काम मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी यांनी तीस दिवसाच्या आत सुरु करणे आवश्यक राहील. अन्यथा दंडाची रक्कम प्रतिदनी रु.१०००/- याप्रमाणे आकारण्यात येईल. सदर रक्कम कोणत्याही कारणास्तव परत मिळणार नाही.

७. संबंधीत विभागामार्फत संबंधीत जिल्हयात करावयाच्या प्रसिध्दीचे नियोजन तालुका निहाय / ग्रामपंचायत निहाय / गाव निहाय करुन देण्यात येईल. त्यास अनुसरुन तालुका निहाय / ग्रामपंचायत निहाय / गाव निहाय योजनेची प्रसिध्दी करण्याची कार्यवाही करणे मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी यांच्यावर बंधनकारक राहील. सदर गावाचा मार्गदर्शक नकाशा संबंधीत विभागांकडून मिळेल. तसेच प्रत्येक वाहनासोबत संबंधीत विभागाच्या तृतीयश्रेणी कर्मचा-यांची नेमणूक करणे सदर विभागाला बंधनकारक राहील.

८. मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी, यांना त्यांचेकडील प्रसिध्दीसाठी उपयोगात आणण्यात येणा-या सर्व वाहनांचा विमा उतरविणे आवश्यक राहील.

९. मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी यांना कोणत्याही विभागाची प्रसिध्दी सुरु करण्यापूर्वी प्रादेशिक उपप्रादेशिक परिवहन अधिकारी यांचे प्रमाणपत्र सदर विभागामध्ये सादर करणे आवश्यक राहील.

१०. व्यापक प्रसिध्दी शासकीय विभागाने ठरवून दिलेल्या कालावधीमध्ये न केल्यास मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी प्रतिदिनी रु. १०००/- इतक्या दंडास पात्र राहील. दंडाची रक्कम कोणत्याही कारणास्तव परत मिळणार नाही.

११. संबंधित गांवातील अंगणवाडी सेविका/ सरपंच/ग्रामसेवक किंवा तलाठी यांचे प्रमाणपत्र नसल्यास अथवा समाधानकारक जाहिरात न केल्यास संबंधीत शासकीय विभागाकडून मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी यांना देयकाची रक्कम अदा केली जाणार नाही.

१२. महाराष्ट्रातील ग्रामीण /डोंगराळ/अतिदुर्गम/ आदिवासी /नक्षलग्रस्त /शहरी भागात शासकीय योजनांची फिरत्या वाहनाव्दारे शासकीय /निमशासकीय/स्थानिक स्वराज्य संस्था या कार्यालयाच्या शासकीय योजनाची प्रसिध्दी करण्यासाठी कोणत्याही प्रकारची आगाऊ रक्कम मे. दत्तात्रय ॲडव्हार्टायझिंग कंपनी यांना दिली जाणार नाही.

१३. मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी यांनी फिरत्या वाहनाव्दारे शासकीय योजनांची प्रसिध्दी केल्यानंतर कामाचे देयक तीन प्रतीमध्ये आगाऊ पोच पावतीसह संबंधीत कार्यालयास सादर करणे आवश्यक आहे. प्रशासकीय कारणामुळे संबंधीत शासकीय कार्यालयास देयक अदा करण्यास विलंब झाल्यास कोणत्याही प्रकाराचे विलंब शुल्क अथवा व्याज अदा केले जाणार नाही.

१४. मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी यांना संबंधीत शासकीय/ निमशासकीय/ स्थानिक स्वराज्य संस्था यांनी ठरवून दिलेल्या अटी व शर्ती मान्य असल्याबाबत व विहित वेळेमध्ये काम पूर्ण करणेबाबत स्वतंत्रपणे रुपये १००/- च्या स्टॅम्प पेपरवर करारनामा करुन देणे बंधनकारक राहील.

१५. संबंधित कार्यालयाकडून मिळालेल्या एकूण कामाच्या रक्कमेच्या तीन टक्के रक्कमेवर राष्ट्रीयीकृत बँकेची बँक गॅरेंटी संबंधित विभागात काम पूर्ण होईपर्यत अनामत रक्कम म्हणून भरणा करणे आवश्यक राहील. काम समाधानकारकरित्या पुर्ण झाल्यानंतर बँक गॅरेंटी मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी यांना परत करण्यात येईल.

१६. शासकीय योजनाची प्रसिध्दी योग्य प्रकारे न केल्यास तसेच करारनाम्यातील अटी व शर्तीचे पालन न केल्यास मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी यांच्याशी केलेला करारनामा रद्द करण्यात येईल आणि त्यांची माहिती जनसंपर्क महासंचालनालयाकडे असलेली अनामत रक्कम म्हणून असलेली बँक गॅरेंटी रुपये १,००,०००/- शासन जमा करण्यात येईल.

१७. मे. दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी यांना माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाशी रुपये १००/- च्या स्टॅम्प पेपरवर करारनामा करावा लागेल आणि करारनाम्यासोबत अनामत रक्कम म्हणून एक लाख रुपयांची राष्ट्रीयीकृत / शेडयुल बँकेची बँक गॅरेंटी देणे आवश्यक राहील.

१८. अ.क्र. १ ते १७ येथे नमूद केलेल्या अटी व शर्तीमध्ये सुधारणा करण्याचे /बदल करण्याचे अधिकार महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांना राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०११०८३०१७००१६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( ओ.म.लुडबे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

महासंचालक, (माहिती व जनसंपर्क) मंत्रालय, मुंबई,
संचालक(माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मंडळे/ महामंडळे/ स्थानिक स्वराज्य संस्था/ शासनाच्या स्वायत्त संस्था,
महालेखापाल महाराष्ट्र - १/२, ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर,
महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा) मुंबई/ नागपूर,
अधिदान व लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख.
संचालक (माहिती), नागपूर- अमरावती,
संचालक (माहिती) महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली,
उपसंचालक(माहिती), नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, कोकण , कोल्हापूर विभाग,
सर्व जिल्हा माहिती अधिकारी,
सर्व उप माहिती कार्यालये,
मे.दत्तात्रय ॲडव्हर्टायझिंग कंपनी , अमरावती
निवडनस्ती.